VISION-2020 संकल्पना टिपणीवर विभागातील अधिकाऱ्यांचे अभिप्राय/ प्रतिक्रिया प्राप्त करून घेण्यासाठी दि. ३१ ऑगस्ट, २०१३ रोजी वाल्मी, औरंगाबाद येथे एक दिवसीय कार्यशाळा.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्र.ई-प्रशा १०१३/(१८५/१३)/लपा-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. २७ ऑगस्ट, २०१३.

**परिपत्रक**

जलसंपदा विभागाचे VISION २०२० निश्चित करण्यासाठी व विभागामध्ये सुधारणा आणण्याच्या दृष्टीने विभागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आठ अभ्यासगटांनी दि.७.८.१३ रोजी त्यांच्या संकल्पना टिपणीचे (Concept Note) सादरीकरण केले आहे. सदर अभ्यासगटांकडून आता सविस्तर अहवालाचे प्रारुप तयार करण्यात येत असून त्याचे सादरीकरण पुढील महिन्याच्या अखेर करण्यात येणार आहे.

२. या अभ्यासगटांनी तयार केलेल्या संकल्पना टिपणीवर जलसंपदा विभागातील इतर अधिकाऱ्यांनी ई-जलसेवा या विभागाच्या पोर्टलवर अभिप्राय/ प्रतिक्रिया नोंदविणेबाबत आवाहन करण्यात आले होते. तथापि या आवाहनाला अत्यल्प प्रतिसाद मिळाला आहे. अभ्यासगटांकडून सविस्तर अहवालाचे प्रारुप तयार करताना संकल्पना टिपणीचे यथायोग्य अवलोकन करुन विभागातील इतर अधिकाऱ्यांनी त्यांचे अभिप्राय/ प्रतिक्रिया नोंदविणे आवश्यक आहे. त्यामुळे यासंदर्भात सर्व अभ्यासगटांसमवेत विभागातील इतर अधिकाऱ्यांची वाल्मी, औरंगाबाद येथे दि. ३१ ऑगस्ट, २०१३ रोजी एक दिवसीय कार्यशाळा आयोजित करण्यात आली आहे.

३. या कार्यशाळेत अभ्यासगटाच्या प्रमुखांनी संकल्पना टिपणीसंदर्भात सविस्तर विवेचन करून इतर अभ्यासगटांच्या सदस्यांसह विभागातील अधिकाऱ्यांच्या प्रतिक्रिया/ अभिप्राय लेखी स्वरुपात जाणून घ्यावयाच्या आहेत.

201502041243107227

४. या कार्यशाळेस प्रधान सचिव (लाक्षेवि) उपस्थित राहणार आहेत.

५. या कार्यशाळेस सर्व कार्यकारी संचालक, मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी उपस्थित राहावयाचे आहे . तसेच विभागातील ज्या अधिकाऱ्यांना अभ्यासगटांनी सादर केलेल्या संकल्पना टिपणीवर (Concept Note) आपल्या प्रतिक्रिया/अभिप्राय लेखी स्वरूपात नोंदविण्याची इच्छा आहे अशा सर्व अधिकाऱ्यांनी या कार्यशाळेस उपस्थित राहावे अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे.

६. ही कार्यशाळा शनिवार दि. ३१ ऑगस्ट,२०१३ रोजी सकाळी १०.०० वाजता सुरु होणार असून सर्वांनी वेळेत उपस्थित रहावे.

७. अभ्यासगटांनी सादर केलेल्या संकल्पना टिपण्या Soft copy द्वारे सोबत उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत.

(डॉ. संजय बेलसरे)
शासनाचे उपसचिव

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी :-

१. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, वाल्मी ,औरंगाबाद यांना सदर कार्यशाळा आयोजित करण्याची व्यवस्था करावी या विनंतीसह अग्रेषित.
४. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
५. सर्व सह सचिव व सर्व मुख्य अभियंता जलसंपदा विभाग.
६.सर्व उपसचिव व सर्व अधीक्षक अभियंता, जलसपंदा विभाग.
७. लपा-१ कार्यासन संग्रहार्थ.